सक्तीचा प्रतीक्षा कालावधी कर्तव्य कालावधी म्हणून मंजूर करणेबाबत.
श्री. ज.रा.सरनाईक, सहसंचालक

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग,

**शासन आदेश क्रमांक : इएसटी-१०१५/प्र.क्र. १२८/का.१४२७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
६ वा मजला, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२.
तारीख : २९ सप्टेंबर, २०१५

## आदेश

श्री.ज.रा.सरनाईक, सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई हे संचालनालयातील सहाव्या आर्थिक गणना कक्षामध्ये सहसंचालक पदावर कार्यरत होते. सहाव्या आर्थिक गणना कक्षाची मुदत दि.३०/०६/२०१५ रोजी संपुष्टात आल्यामुळे श्री.ज.रा.सरनाईक यांना या विभागाच्या समक्रमांकाच्या दि.०८ सप्टेंबर, २०१५ च्या आदेशान्वये सहसंचालक (इ.आ.सं.कें.), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई या पदावर पदस्थापना देण्यात आली आहे. श्री.सरनाईक सदर पदावर दि.१०/०९/२०१५ (म.पू.) रोजी सदर पदावर रुजू झाले आहेत.

२. उपरोक्त परिस्थितीमुळे श्री.ज.रा.सरनाईक यांना दि.०१/०७/२०१५ ते ०९/०९/२०१५ पर्यंत पदस्थापनेशिवाय रहावे लागले. त्यामुळे त्यांचा दि.०१/०७/२०१५ ते ०९/०९/२०१५ हा सक्तीचा प्रतीक्षा कालावधी प्रशासकीय कारणास्तव निर्माण झाला आहे.

३. सदर सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी निर्माण होण्यास श्री.सरनाईक हे स्वत: जबाबदार नसल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९ (१४) (एफ) मधील तरतुदीनुसार श्री.सरनाईक, सहसंचालक यांचा दिनांक ०१.०७.२०१५ (म.पू.) ते ०९.०९.२०१५ (म.नं.) पर्यंतचा (या कालावधीत रजा घेतली असल्यास रजेचा कालावधी वगळून) कालावधी हा “सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी” म्हणून मंजूर करण्यात येत आहे. हे आदेश शासन निर्णय,वित्त विभाग क्र. सेनिवे१००१/१३०/सेवा-४, दि.२ जून, २००३ मधील परिशिष्ट-१ नुसार प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर कालावधीचे वेतन व भत्ते यावरील खर्च श्री.सरनाईक यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखालील सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच, सदरहू वेतन व भत्ते अदा करण्यासाठी लेखाधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदरहू आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०९२९१६०७२६६३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.09.30 16:44:15 +05'30'

**( वसंत कुळकर्णी )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
४) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
५) लेखाधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
६) श्री.ज.रा.सरनाईक, सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
७) निवड नस्ती.